न्यायालयीन दावा स्पे.द.नं.०७/२०१७
श्री.प्रल्हाद गणपत उन्हाळे,मौजे गणेशपूर, ता.खामगांव, जि.बुलढाणा यांना नुकसान भरपाईची रक्कम अदा करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक: न्यायाप्र-२०१८ /प्र.क्र.१०८/११-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ जून, २०१८.

वाचा :- १) मा.दिवाणी न्यायाधीश वरीष्ठ स्तर,कोर्ट खामगांव,जि.बुलढाणा यांचे दि.८/३/२०१७ रोजीचे आदेश.
२) कृषि आयुक्तालय,पुणे यांचे क्र.कृआ./विप्र-१/नैसआ/को.केस प.व्य./२१७/१८, दि.२९/५/२०१८ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

श्री.प्रल्हाद गणपत उन्हाळे, मौजे गणेशपूर यांनी दि.१ जुलै,२०१० रोजी अतिवृष्टीमुळे नाल्यास पूर येऊन शेतीउपयोगी वस्तू जसे ठिबक, तुषार व इतर तसेच केळीपिक वाहून गेल्याने झालेल्या नुकसानीबाबत मा.दिवाणी न्यायालय,खामगांव,जि.बुलढाणा येथे दिवाणी दावा क्र.०७/२०१७ दाखल केलेला होता. मा.न्यायालयाने सदर दाव्यासंदर्भात दि.८/३/२०१७ रोजी निकाल देऊन नुकसान भरपाईची रक्कम रु.२,९१,४५६/- जमा करण्याबाबत आदेश दिलेले आहेत. याप्रकरणी, सहाय्यक सरकारी अभियोक्ता,खामगांव,जि.बुलढाणा यांनी दि.१२/५/२०१७ रोजी सदर न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने कायदेशीर बाजू भक्कम नसल्याने वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल करणे उचित होणार नसल्याचे अभिमत दिलेले आहे. आता पुढील सुनावणी दि.१५/६/२०१८ रोजी असून, त्यापूर्वी सदरची रक्कम रु.२,९१,४५६/- न्यायालयात भरणेसाठी कृषि आयुक्तालयास उपलब्ध करुन देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

श्री.प्रल्हाद गणपत उन्हाळे, मौजे गणेशपूर यांनी दि.१ जुलै,२०१० रोजी अतिवृष्टीमुळे नाल्यास पूर येऊन शेतीउपयोगी वस्तू जसे ठिबक, तुषार व इतर तसेच केळीपिक वाहून गेल्याने झालेल्या नुकसानीबाबत मा.दिवाणी न्यायालय,खामगांव,जि.बुलढाणा येथे दिवाणी दावा क्र.०७/२०१७ दाखल केलेला होता. मा.न्यायालयाने सदर दाव्यासंदर्भात दि.८/३/२०१७ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, नुकसान भरपाईची रु.२,९१,४५६/- (अक्षरी रुपये दोन लाख एक्क्याण्णव हजार चारशे छप्पन्न मात्र) इतकी रक्कम मा.न्यायालयात जमा करण्याकरीता सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून लेखाशीर्ष “मागणी क्र.डी-३, (००) (००१) संचालक व प्रशासन (अनिवार्य) (२४०१ ०१२७) भारीत खर्च” अंतर्गत कृषि आयुक्तालयाकडे उपलब्ध असलेल्या निधीतून वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तुत प्रयोजनार्थ लेखाधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय, बुलढाणा हे आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्तालय स्तरावर संचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०६१४१७४४१०७००१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
Date: 2018.06.14 17:44:27 +05'30'

**( अ. वि. जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
३. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
४. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
५. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
८. विभागीय कृषि सहसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
९. जिल्हाधिकारी,बुलढाणा.
१०. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,बुलढाणा.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२. वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१४. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५. सह सचिव (११-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
१६. कक्ष अधिकारी (२-अे),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१७. निवड नस्ती (का.११-अे).